तात्काळ / कालमर्यादा

**मुख्यमंत्री सहाय्यता निधी.**
**गुजरात राज्यातील भूकंपग्रस्तांना मदत.**
**शासकीय/निमशासकीय कर्मचारी**
**यांच्याकडून निधीस देणग्या...**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक:सीएसएफ-१००१/प्र.क्र.१६/२००१/(भाग-४)१६-अ,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १७ एप्रिल, २००१.

संदर्भ :- १) सा.प्र.वि.,परिपत्रक क्रमांक:सीएसएफ-१००१/प्र.क्र.१६/२००१/१६-अ, दि.३०.१.२००१.
२) सा.प्र.वि.,परिपत्रक क्रमांक:सीएसएफ-१००१/प्र.क्र.१६/२००१/(भाग-२)१६-अ, दि.१०.२.२००१.
३) सा.प्र.वि.,परिपत्रक क्रमांक:सीएसएफ-१००१/प्र.क्र.१६/२००१/(भाग-३)१६-अ, दि.३.३.२००१.

**परिपत्रक**

गुजरात राज्यातील भूकंपग्रस्तांना सहाय्य करण्यासाठी राज्य शासनाच्या सर्व गट-अ ते गट-ड मधील अधिकारी/कर्मचारी यांच्या एकूण मासिक वेतनातून (महागाई व अन्य भत्त्यासह) एक दिवसाचे वेतन कापून घेण्यात यावे, अशा सूचना संदर्भाधिन परिपत्रकान्वये देण्यात आल्या होत्या. तथापि अद्याप बऱ्याच अधिकारी/कर्मचारी यांच्या मासिक वेतनातून अशा प्रकारची वसूली करण्यात आलेली नाही, असे निदर्शनास आले आहे. आता यासंदर्भात खालील प्रमाणे पुन्हा सूचना देण्यात येत आहेत,

१) ज्यां अधिकारी/कर्मचारी यांच्या मासिक वेतनातून यापूर्वी उपरोक्त प्रयोजनार्थ एक दिवसाच्या वेतनाइतकी रक्कम कापून घेण्यात आली नसेल/ धनादेशाद्वारे प्राप्त झाली नसेल, अशा अधिकारी व कर्मचारी यांनी भूकंप सहायता निधीसाठी एक दिवसाचे वेतन देवू इच्छित नाही, असे लिहून दिले नसेल, अशा अधिकारी/कर्मचारी यांचे एक दिवसाचे वेतन एकूण मासिक वेतनातून परस्पर कापून घेण्यात यावे.

२) वरीलप्रमाणे कापून घेण्यात आलेली रक्कम "मुख्यमंत्री सहायता निधी, गुजरात" मध्ये जमा करण्याबाबत शासन परिपत्रक दि.३०.१.२००१ व शासन परिपत्रक दि.१० फेब्रुवारी, २००१ अन्वये कार्यवाही करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

द.दा.देशपांडे
( द. दा. देशपांडे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री,राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

मुख्य सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
* प्रबंधक,उच्च न्यायालय,मूळ न्याय शाखा,मुंबई,
* प्रबंधक,उच्च न्यायालय,अपील शाखा,मुंबई,
* प्रबंधक,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई,
* प्रबंधक,लोकआयुक्त व उप लोकायुक्त,मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई,
* सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,विधानभवन,मुंबई,
* सचिव,राज्य निवडणूक आयोग,
महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता)महाराष्ट्र-१,मुंबई,
महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता)महाराष्ट्र-२,नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
निवासी व लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त, / सर्व जिल्हाधिकारी/जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
राज्यातील सर्व महामंडळे आणि उपक्रम यांचे सर्व व्यवस्थापकीय संचालक ,
संचालक,माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय,मुंबई (प्रसिध्दीपत्रक काढण्याच्या विनंतीसह)
मंत्रालयीन विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख,
उप सचिव, वित्त विभाग, व्यय-४, मंत्रालय,मुंबई,
महाराष्ट्र राज्य राजपत्रित अधिकारी महासंघ, मुंबई,
राज्य सरकारी कर्मचारी मध्यवर्ती संघटना,महाराष्ट्र ,
महाराष्ट्र राज्य जिल्हा परिषद कर्मचारी महासंघ,
सरकारी / निमसरकारी कर्मचारी आणि शिक्षक संघटना समन्वय समिती
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभाग /कार्या.क्रमांक १९,१९-अ,२१,२३,२५,२६,३०,वितंक व इतर सर्व कार्यासने.
निवड नस्ती.

* पत्राने.